मुख्यमंत्री ग्राम सडक योजना (संशोधन व विकास) अंतर्गत रत्नागिरी जिल्ह्यातील पॅ.क्र. RD RAT-११ मधील कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा या रस्त्याच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२०/प्र.क्र.३५९/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख : २८ डिसेंबर, २०२१

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१८/प्र.क्र.१५०२/बांधकाम-४, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१८.

२) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/९६२/२०२०, दिनांक ०६ नोव्हेंबर, २०२०.

३) **वित्त विभागाचे पत्र क्रमांकः** व्यअस-२०२१/प्र.क्र.१४३/अर्थ-२, दिनांक ०९ डिसेंबर, २०२१.

४) **व्यय अग्रक्रम समितीचे** दिनांक २५ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना (संशोधन व विकास) अंतर्गत रत्नागिरी जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD RAT-११ मधील कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.७४१.२१ लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक ०२ मार्च, २०१९ रोजी देण्यात आला आहे.

०२. सदर कामाच्या जादा दराची निविदा स्वीकृती असल्यामुळे, विषयांकित रस्ता हा दुर्गम व डोंगराळ भुभागातून जात असल्याने व मानवीय सर्वेक्षणाच्या मर्यादा विचारात घेता, ड्रोन सर्वेक्षण करण्यात आल्याने तसेच प्रस्तावित रस्ता समुद्रसपाटीपासून ३००० मी. पेक्षा जास्त उंच असल्याने सदर रस्ते खोदकामासाठी मुळ मंजुर वाव न बदलता जागेवरील प्राप्त परिस्थितीत IRC च्या मार्गदर्शक सूचनेनुसार १:१० ग्रेड साध्य करण्याकरिता कामांच्या किंमतीत वाढ झाल्याने, सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या

उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक ०६ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

०३. विषयांकित कामाच्या जादा दराची निविदा स्वीकृती असल्यामुळे, विषयांकित रस्ता हा दुर्गम व डोंगराळ भुभागातून जात असल्याने व मानवीय सर्वेक्षणाच्या मर्यादा विचारात घेता, ड्रोन सर्वेक्षण करण्यात आल्याने तसेच सदर रस्ते खोदकामासाठी मुळ मंजुर वाव न बदलता जागेवरील प्राप्त परिस्थितीत IRC च्या मार्गदर्शक सूचनेनुसार १:१० ग्रेड साध्य करण्याकरिता कामांच्या किंमतीत वाढ झाल्याने, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मान्यतेनुसार, रत्नागिरी जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD RAT-११ मधील कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा या रस्त्याच्या रू.११३०.४० लक्ष इतक्या किंमतीच्या कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना (संशोधन व विकास) अंतर्गत रत्नागिरी जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD RAT-११ मधील कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा या रस्त्याच्या मुळ कामाच्या जादा दराची निविदा स्वीकृती असल्यामुळे, विषयांकित रस्ता हा दुर्गम व डोंगराळ भुभागातून जात असल्याने व मानवीय सर्वेक्षणाच्या मर्यादा विचारात घेता, ड्रोन सर्वेक्षण करण्यात आल्याने तसेच सदर रस्ते खोदकामासाठी मुळ मंजुर वाव न बदलता जागेवरील प्राप्त परिस्थितीत IRC च्या मार्गदर्शक सूचनेनुसार १:१० ग्रेड साध्य करण्याकरिता कामांच्या किंमतीत वाढ झाल्याने, सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

(Rs.Lakh)

| Package No. | Name of Work | AA Sancation Cost | Tendered Cost (7.08 % above) (GST + Royalty) | Revised Expenditure | Excess over AA cost | % Excess over AA cost |
|---|---|---|---|---|---|---|
| *1* | *2* | *3* | *4* | *5* | *6* | *7* |
| RD RAT-11 | कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा, जि.रत्नागिरी | 741.21 | 768.89 | 1130.40 | 389.19 | 52.51 |
| **Total** | | **741.21** | **768.89** | **1130.40** | **389.19** | **52.51** |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू.११३०.४० लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या ५२.५१ % जास्तीचा म्हणजेच रू.३८९.१९ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार सुधारित अंदाजपत्रकातील अधिक्य सुरूवातीस मंजुर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५ % पेक्षा

अधिक्याचा (५२.५१ %) असल्याने, सदर प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्राम सडक योजना (संशोधन व विकास) अंतर्गत रत्नागिरी जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD RAT-११ मधील कोचरी माचाळ रस्ता, ता.लांजा या रस्त्याच्या रू.११३०.४० लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.
- सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.
- कामाची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा व विहित निविदा कार्यपद्धती अनुसरण्यात यावी.
- सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही.

**०५.** सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी- ५०५४ ५१५३" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२११२२७१७३९०३७२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e86ac5658c4f446f46a56052bf048257ffe4ea09078de9d556ae5babe8adc8b1, pseudonym=37D9D56800E3803E7F4DEAA21F9F7FAB712736F6, serialNumber=481AF6EECE7C1D432D3119135BE703BF6529E7A455A9B17708C677B565D8EE24, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2021.12.28 10:54:56 +05'30'

**(प्रविण जैन)**

**वित्तीय नियंत्रक तथा उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
४. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.

५. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
६. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, कोकण विभाग, ठाणे.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी.
११. कार्यकारी अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जि. रत्नागिरी.
१२. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, रत्नागिरी.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
१४. वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना.
१५. माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री /मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१६. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.